माहिती व जनसंपर्क महासंचालनालय व अधिनस्त कार्यालयाचे सक्षमीकरण व बळकटीकरण करण्यासाठी समिती नेमणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः मावज-२०२४/१३९/प्र.क्र. ३९ / मावज-२,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- १५ मे, २०२४.

**संदर्भ :-** माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे क्र. प्रविस्था-१०(२०२४)/बळकटीकरण/का-१/३६४, दिनांक ९ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना :-**

"माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे सक्षमीकरण व बळकटीकरण करण्यासाठी आवश्यक कार्यवाही करावी", असे निदेश राज्य मंत्रिमंडळाच्या दि. ३१ ऑक्टोबर, २०२३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत मंत्रिमंडळाने दिले आहेत. त्याअनुषंगाने संचालक (माहिती) (प्रशासन) यांनी दिनांक ९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या पत्राने महासंचालनालयाचे सक्षमीकरण व बळकटीकरण करण्याच्या दृष्टीने सुधारणा सुचविण्यासाठी शासनस्तरावर समिती गठीत करण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर केला आहे. या अनुषंगाने समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे सक्षमीकरण व बळकटीकरण करण्यासाठी पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | उपसचिव (मावज-२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | संचालक (माहिती) (वृत्त जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | संचालक (माहिती), छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर | सदस्य |
| ५ | अवर सचिव (मावज-२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६ | उपसंचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

**समितीचे कार्य :-**

१) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील सध्याचे मनुष्यबळ, आवश्यक मनुष्यबळ, साधनसामग्री, अद्ययावत तंत्रज्ञान, विविध प्रकारचे सॉफ्टवेअर्स, प्रशिक्षण, मुख्यालय तसेच क्षेत्रिय कार्यालयांची संरचना, वाहने, कामाकाजाच्या अनुषंगाने विविध धोरणे,

कार्यपध्दती आदी बाबींचा अभ्यास समिती करुन, त्यावर उपायोजना सुचविणारा अहवाल शासनास सादर करण्यात येईल.

२) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयाची पुनर्रचना करणे.

३) सर्व संचालक (माहिती) यांना नेमून देण्यात आलेले विषय व कामकाजाचे वाटप तसेच, जबाबदाऱ्या व कर्तव्य या बाबतची पुनर्रचना करणे.

४) महासंचालनालयातंर्गत मंजूर आकृतिबंधातील सध्या आवश्यक नसलेल्या पदांचे रुपांतरण करणे.

५) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातंर्गत सर्व विभाग उपविभाग तसेच जिल्हास्तरीय कार्यालये येथे मंजूर व रिक्त पदांचा आढावा घेवून त्यांचा Flowchart तयार करुन तेथील अधिकारी व कर्मचाऱ्यांचे तेथील कामकाजांच्या स्वरुपाच्या अनुषंगाने पुनर्वाटप करणे.

२. सदरहू समितीने प्रत्येक महिन्यात किमान चार बैठका घेवून समितीचा अंतिम अहवाल दि.१५ जून, २०२४ पर्यंत शासनास सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०५१५१५४९१५०९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMRIDHI VIJAYKUMAR ANGOLKAR

Digitally signed by SAMRIDHI VIJAYKUMAR ANGOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=75fb066f4ac20e1679d8a5748d7e2501eac9d8a88727d55e8fe136e3ff41b40d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7BF9301848DB293FE7C842EAA747173CA077E63D2A87286181747EAF03076947, cn=SAMRIDHI VIJAYKUMAR ANGOLKAR
Date: 2024.05.15 16:01:57 +05'30'

**( समृध्दी वि. अनगोळकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२. प्रधान सचिव (मा.वज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
४. संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
५. संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क, नागपूर-अमरावती विभाग, नागपूर,
७. संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क, मराठवाडा विभाग, छत्रपती संभाजीनगर,
८. अवर सचिव (मावज-२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. उपसंचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१०. उप संचालक (वृत्त) /(प्रकाशने) /(प्रदर्शने) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
११. उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोकण विभाग /नवी मुंबई / नाशिक/ पुणे/ कोल्हापूर/ अमरावती /लातूर,
१२. उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१३. उपसंचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१५. निवडनस्ती (का. मावज-२).